३५६/नावि २९
२९/९/०९

**प्रारुप नगर रचना योजना पनवेल क्र.१ (प्रथम फेरबदल)**
**(अंतिम) जि. रायगड**
महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम १९६६ चे कलम ७२ (४) अनुसार मुदतवाढ मंजूर करणे बाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ३१ ऑगस्ट २००९.

**निर्णय क्रमांक :** टिपीएस- १७०५/१३२/प्र. क्र.३४/०८/नवि-१२

**पहा :** १.लवाद, नगर रचना योजना, पनवेल क्र.१ तथा सहायक संचालक, नगर रचना, अलिबाग यांचे शासनास उद्देशून पत्र क्र. ससंनरराअ/नरयो पनवेल क्र.१ (प्र.फे.(अं))/२१५२, दि.३०/१२/०४

**२.** संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे शासनास उद्देशून पत्र क्र.नरयो-पनवेल क्र.१/कलम८६/छाननी/टिपीव्ही-३/१५७८, दि.३०/०३/०७

**निर्णय :-** सोबतची अधिसूचना (मराठी व इंग्रजी) महाराष्ट्र शासनाचे राजपत्र, भाग-एक कोकण विभागीय पुरवणी मध्ये **असाधारण** म्हणून प्रसिद्ध करावी.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,**

**(अशोक बा.पाटील )**
**कार्यासन अधिकारी.**

प्रत:-

१) आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई.
२) संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) उपसंचालक, नगर रचना, कोकण विभाग, नवी मुंबई.
४) सहायक संचालक, नगर रचना, रायगड-अलिबाग
५) जिल्हाधिकारी, रायगड-अलिबाग
६) मुख्याधिकारी, पनवेल नगरपरिषद पनवेल जि. रायगड
७) व्यवस्थापक, शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, नेताजी सुभाष पथ,चर्नी रोड, मुंबई-४०० ००४.

/- त्यांना विनंती करण्यात येते की, सोबत पाठविलेली अधिसूचना महाराष्ट्र शासन राजपत्राच्या कोकण विभागीय पुरवणी मध्ये प्रसिध्द करुन त्यांच्या १० प्रती हया कार्यालयास व प्रत्येकी १० प्रती (१) संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे, (२) उपसंचालक, नगर रचना, कोकण विभाग, नवी मुंबई, व (३) सहायक संचालक, नगर रचना, रायगड-अलिबाग, यांना पाठवाव्यात.

८) निवड नस्ती नवि-१२

९) कक्ष अधिकारी (संगणक कक्ष) (नवि २९), नगर विकास विभाग मंत्रालय मुंबई ४०० ०३२ (त्यांना विनंती करण्यात येते की सोबतची अधिसूचना विभागाच्या वेबसाईटवर प्रकाशित करण्याबाबत आवश्यक ती कार्यवाही करावी)

१ ३१.८

C:\Documents and Settings\trimax1\My Documents\8.0_tps_Panvel__noti.rtf

**नगर विकास विभाग**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ३१ ऑगस्ट २००९.

**महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम १९६६**

क्रमांक-टीपीएस- - १७०५/१३२/प्र. क्र.३४/०८/नवि-१२ ज्या अर्थी महाराष्ट्र शासनाने, नगर विकास व सार्वजनिक आरोग्य विभागाचे अधिसूचना क्रमांक टीपीएस-१४७५/१४३९/युडी-६,दिनांक १३.०४.१९७६ अन्वये, ***प्रारुप नगर रचना* योजना, पनवेल क्रमांक १ *(प्रथम फेरबदल)* (प्रारुप*)*** (यापुढे उक्त प्रारुप योजना असे उल्लेखित ) महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ (सन १९६६ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ३७) (यापुढे उक्त अधिनियम असे उल्लेखित) च्या कलम ६८, पोट-कलम (२) मधील तरतुदी नुसार मंजूर केली आहे;

आणि ज्याअर्थी, शासनाने नगर विकास व सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अधिसूचना क्रमांक टीपीएस-१४७५/१४३९/यूडी-६, दिनांक १५.०४.१९७६ अन्वये, उक्त प्रारुप योजना अंतिम करण्यासाठी, उक्त अधिनियमाच्या कलम ७२ (१) मधील तरतुदीनुसार, तत्कालीन उपसंचालक, नगर रचना , मुंबई विभाग, मुंबई यांची लवाद म्हणुन नेमणुक केली होती, तद्नंतर अधिसूचना क्रमांक टीपीएस-१४८०/१७७९/यूडी-५, दिनांक ०७.०४.१९८१ अन्वये लवाद, नगर रचना योजना, जळगाव (सदरहू कार्यालय कालांतराने श्रीरामपूर येथे शासन निर्णय दि. १३.०१.१९८४ अन्वये स्थलांतरीत झाले ) यांची लवाद म्हणून नेमणुक केली होती, आणि तद्नंतर संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी, कामकाजाच्या सोयीच्या दृष्टिकोनातून अधिसूचना क्रमांक टिपीएस-पनवेल/क्र-१/९०-९६/ टिपीव्ही-३/८४७, दिनांक १८.०२.१९९७ अन्वये सहायक संचालक, नगर रचना, अलिबाग यांची लवाद म्हणून नेमणूक केली आहे;

आणि ज्याअर्थी, उक्त प्रारुप योजना अंतिम करण्यासाठी नियुक्त केलेल्या लवाद यांनी त्यांचेकडील अधिसूचना दि. २५.०९.१९८७ अन्वये, उक्त अधिनियमाच्या कलम-७२(३) उपकलम (xviii) मधील तरतूदी नुसार **निवाडा** जाहीर केलेला आहे व उक्त प्रारुप योजनेची आखणी विहित नमुन्यात अंतिम करुन ताबडतोब त्यांचे निर्णय संबंधित पक्षास कळविले; तसेच संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी कळविलेल्या त्रुटींची पूर्तता करुन, तसेच मंजूर सुधारित विकास योजना/नियमावली यामध्ये सुसंगती साधण्याच्या दृष्टीने, तद्नंतर लवाद यांनी त्यांचेकडील अधिसूचना दि. ३०.१२.१९९५ अन्वये, **पूरक निवाडा** जाहीर केलेला आहे व उक्त प्रारुप योजनेची आखणी विहित नमुन्यात अंतिम करुन ताबडतोब त्यांचे निर्णय संबंधित पक्षास कळविले;

आणि ज्याअर्थी लवाद तथा सहायक संचालक, नगर रचना, अलिबाग यांनी उक्त प्रारुप योजना अंतिम करुन व अपील न्यायाधिकरणाने दिनांक २४.१२.२००३ रोजी दिलेल्या निर्णयांचा अंतर्भाव करुन, **प्रारुप नगर रचना योजना पनवेल क्र.१ (प्रथम फेरबदल)(अंतिम)** ही योजना कलम ८२ (२) खालील तरतुदीनुसार पत्र.क्र.२१५२, दि.३०.१२.२००४ अन्वये शासनास सादर केलेली आहे (यापुढे उक्त प्रारुप अंतिम योजना असे उल्लेखित);

आणि ज्याअर्थी, लवादांचे कामकाज पूर्ण करण्यासाठी उक्त अधिनियमाच्या कलम-७२ खालील मुदत संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी त्यांच्या अधिसूचना क्रमांक नरयो/पनवेल क्र.१/टीपीव्ही-३/६२४७, दिनांक २३.९.१९८७ अनुसार, दिनांक २८.९.१९८७ पर्यंत मुदतवाढ मंजूर केली असून, सदरहू अधिसूचना महाराष्ट्र शासन राजपत्रात, दिनांक ८.१०.१९८७,रोजी पृष्ठ क्र. १५४४, भाग दोन वर प्रसिद्ध झालेली आहे;

आणि ज्याअर्थी, आवश्यक ती चौकशी केल्यानंतर आणि संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेशी विचारविनिमय केल्यानंतर, उक्त योजनेस अंतिम स्वरुप देणेसाठी उक्त अधिनियमाच्या कलम-७२ च्या तरतूदीनुसार लवादीय कामकाजासाठी आवश्यक कालावधी दिनांक २९.०९.१९८७ पासून दिनाक ३०.१२.१९९५ पर्यंत वाढवून देणे सार्वजनिक हिताचे दृष्टीने आवश्यक आहे असे शासनाचे मत आहे ;

**त्याअर्थी, आता उक्त अधिनियमाच्या कलम ७२, पोट-कलम (४) खालील अधिकारांचा व त्या संबंधातील इतर सर्व अधिकारांचा वापर करुन महाराष्ट्र शासन याद्वारे :-**

उक्त योजनेस अंतिम स्वरुप देणेसाठी कलम ७२(३) अन्वये लवादीय कामकाजासाठी आवश्यक कालावधी दिनांक २९.०९.१९८७ पासून ३०.१२.१९९५ पर्यंत हा दिवस धरुन मुदतवाढ मंजूर करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,**

**(अशोक बा.पाटील)**
**कार्यासन अधिकारी.**

*-*-*-*-*-*

Urban Development Department
Mantralaya, Mumbai -400 032
Dated : 31st August 2009

Maharashtra Regional & Town Planning Act, 1966

No. TPS-1705/132/CR-34/08/UD-12, Whereas, vide the Government Notification, Urban Development and Public Health Department No. TPS-1475 / 1439 / UD-6, dated 13-04-1976, issued under sub-section (2) of Section 68 of the Maharashtra Regional & Town Planning Act, 1966 (Mah.XXXVII of 1966) (hereinafter referred to as ' the said Act') the Government of Maharashtra has sanctioned the Draft Town Planning Scheme, Panvel No.1 (1st Variation) (Draft) (hereinafter referred to as ' the said Draft Scheme ')

And whereas, by Government Notification, Urban Development and Public Health Department No. TPS-1475/1439/UD-6, dated 15-04-1976 the then Deputy Director of Town Planning, Mumbai Division, Mumbai was appointed as the Arbitrator for finalising the said Draft Scheme. Further vide Notification No.TPS-1480/1779/UD-5, dated 07.04.1981 Arbitrator, Town Planning Scheme, Jalgaon (whose office was subsequently shifted to Shrirampur vide resolution dated 13.01.1984) was appointed as the Arbitrator under Section 72(1) of the said Act and further to facilitate the functioning, the Director of Town Planning, Maharashtra State, Pune vide his Notification No.TPS-Panvel/No-I/90-96/TPV-3/847, dated 18.02.1997 has appointed the Assistant Director of Town Planning, Alibag as the Arbitrator for finalising the said Draft Scheme,

And whereas, the Arbitrator, as required under Clause (xviii) of sub-section (3) of Section 72 of the said Act, had drawn up, in the prescribed form, the final scheme in accordance with the said Draft Scheme vide his Notification dated 25.09.1987 and his decisions had been communicated forthwith to the parties concerned; further as communicated by the Director of Town Planning, Maharashtra State, Pune, in order to remove the ambiguities as regard to the sanctioned development plan/revised development plan, and to incorporate the development control regulations contained in the sanctioned development plan, so as to have consistency therein, the Arbitrator, as required under Clause (xviii) of sub-section (3) of Section 72 of the said Act, had further drawn up in the prescribed form, the final scheme in accordance with the said Draft Scheme (hereinafter referred to as ' the said final scheme ') and declared a supplementary award vide his Notification dated 30.12.1995 and his decisions had been communicated forthwith to the parties concerned;

And whereas, the Assistant Director of Town Planning, Alibag as the Arbitrator has, as required under sub-section (2) of Section 82 of the said Act, forwarded the said final scheme after making due variations in accordance with the decisions of the Tribunal of Appeal dated 24.12.2003, to the State Government for sanction vide letter No 2152 dated 30.12.2004 (hereinafter referred to as ' the said draft final scheme ');

And whereas, in order to enable the Arbitrator to decide on the matters as required under section 72 of the said Act, the Director of Town Planning, Maharashtra State, Pune vide his notification no. TPS/Panvel No.1/TPV-3/6247 dtd.23.9.1987 had extended this period up to 28.9.1987, which has appeared in the Maharashtra Government Gazette on 8.10.1987 in Part-II page no.1544;

And whereas, the Government of Maharashtra after making necessary enquiries and after consulting the Director of Town Planning, Maharashtra State, Pune, is of the opinion that the period as required under section 72(4) of the said Act needs to be extended from 29.9.1987 up to inclusive 30.12.1995 in the interest of public;

Now, therefore, in exercise of the powers conferred by sub-section (4) of Section 72 of the said Act and all other powers enabling it in that behalf, the Government of Maharashtra hereby: -

extends the period for deciding all the matters referred to in sub-section (3) of Section 72 by the Arbitrator for the said draft final scheme by a further period from 29-09-1987 up to and inclusive of 30-12-1995

By order and in the name of the Governor of Maharashtra,

(Ashok B. Patil)
Section Officer

*-*-*-*-*-*

**नगर रचना योजना पनवेल क्र.१ (प्रथम फेरबदल) (अंतिम) जि. रायगड**

महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम १९६६ चे कलम ८६ (२) अनुसार अंतिम नगर रचना योजना मंजूर करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक - ३१ऑगस्ट २००९

**निर्णय क्रमांक** : टिपीएस- १७०५/१३२/प्र.क.३४/०८/नवि-१२

**पहा** : १.लवाद, नगर रचना योजना, पनवेल क्र.१ तथा सहायक संचालक, नगर रचना, अलिबाग यांचे शासनास उद्देशून पत्र क्र.नरयो-पनवेल क्र.१(प्र.फे.(अं))/२१५२, दि.३०.१२.२००४.

२. संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे शासनास उद्देशून पत्र क्र.नरयो-पनवेल क्र.१/कलम ८६/छाननी/टीपीव्ही-३/१५७८, दि.३०/०३/०७

**निर्णय** :- सोबतची अधिसूचना (मराठी व इंग्रजी) महाराष्ट्र शासनाचे राजपत्र, भाग-एक कोकण विभागीय पुरवणी मध्ये **असाधारण** म्हणून प्रसिद्ध करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

**(अशोक बा.पाटील)**
**कार्यासन अधिकारी.**

प्रत:-

१) आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई.
२) संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) उपसंचालक, नगर रचना, कोकण विभाग, नवी मुंबई.
४) सहायक संचालक, नगर रचना, रायगड-अलिबाग
५) जिल्हाधिकारी, रायगड-अलिबाग
६) मुख्याधिकारी, पनवेल नगरपरिषद पनवेल जि. रायगड
७) व्यवस्थापक, शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, नेताजी सुभाष पथ,चनी रोड, मुंबई-४०० ००४.
/- त्यांना विनंती करण्यात येते की, सोबत पाठविलेली अधिसूचना महाराष्ट्र शासन राजपत्राच्या कोकण विभागीय पुरवणीमध्ये प्रसिद्ध करुन त्यांच्या ५० प्रती शासनास व प्रत्येकी २५ प्रती (१) संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे, (२) उपसंचालक, नगर रचना, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई, व (३) सहायक संचालक, नगर रचना, रायगड-अलिबाग, यांना पाठवाव्यात.
८) महासंचालक माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२ त्यांना विनंती करण्यात येते की, सोबत पाठविलेली अधिसूचना पनवेल येथे प्रसार/ख्य असलेल्या किमान एका स्थानिक दै.वर्तमानपत्रात एकवेळ प्रसिध्द करण्याची व्यवस्था करावी. तसेच प्रसिध्द झालेल्या संबंधित दैनिकाच्या ५ प्रती संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याकडे पाठविण्यासाठी संबंधितांना कृपया सूचना द्याव्यात.

*-*-*-*-*-*-*

C:\Documents and Settings\trimax1\My Documents\8.0_tps_Panvel__noti.rtf

**नगर विकास विभाग**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक -३१ ऑगस्ट २००९

## महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम १९६६

क्रमांक-टीपीएस- १७०५/१३२/प्र.क.३४/०८/नवि-१२- ज्या अर्थी महाराष्ट्र शासनाने, नगर विकास व सार्वजनिक आरोग्य विभागाचे अधिसूचना क्रमांक टीपीएस-१४७५/१४३९/युडी-६,दिनांक १३.०४.१९७६ अन्वये, पनवेल नगर पालिकेने त्यांचे पत्र क्र. २९, दिनांक ०८.०४.१९७५ अन्वये मंजुरीसाठी सादर केलेली ***प्रारुप नगर रचना योजना, पनवेल क्रमांक १ (प्रथम फेरबदल) (प्रारुप)*** (यापुढे उक्त प्रारुप नगर रचना योजना असे उल्लेखित ) महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ (सन १९६६ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ३७) (यापुढे उक्त अधिनियम असे उल्लेखित) च्या कलम ६८, पोट-कलम (२) मधील तरतुदी नुसार मंजूर केली आहे;

आणि ज्याअर्थी, शासनाने नगर विकास व सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अधिसूचना क्रमांक टीपीएस-१४७५/१४३९/यूडी-६, दिनांक १५.०४.१९७६ अन्वये, उक्त प्रारुप नगर रचना योजना अंतिम करण्यासाठी, उक्त अधिनियमाच्या कलम ७२ (१) मधील तरतुदीनुसार, तत्कालीन उपसंचालक, नगर रचना , मुंबई विभाग, मुंबई यांची लवाद म्हणुन नेमणुक केली होती, तद्‌नंतर अधिसूचना क्रमांक टीपीएस-१४८०/१७७९ / यूडी-५, दिनांक ०७.०४.१९८१ अन्वये लवाद, नगर रचना योजना, जळगाव (सदरहू कार्यालय कालांतराने श्रीरामपूर येथे शासन निर्णय दि. १३.०१.१९८४ अन्वये स्थलांतरित झाले ) यांची लवाद म्हणून नेमणुक केली होती. तद्‌नंतर संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी, कामकाजाच्या सोयीच्या दृष्टीकोनातून त्यांची अधिसूचना क्रमांक टिपीएस-पनवेल/क्र-१/९०-९६/टिपीव्ही-३/८४७, दिनांक १८.०२.१९९७ अन्वये सहायक संचालक, नगर रचना, अलिबाग यांची लवाद म्हणून नेमणूक केली आहे;

आणि ज्याअर्थी, उक्त प्रारुप नगर रचना योजना अंतिम करण्यासाठी नियुक्त केलेल्या लवाद यांनी त्यांचेकडील अधिसूचना दि. २५.०९.१९८७ अन्वये, उक्त अधिनियमाच्या कलम-७२(३) उपकलम (xviii) मधील तरतूदी नुसार **निवाडा** जाहीर केलेला आहे व उक्त प्रारुप योजनेची आखणी विहित नमुन्यात अंतिम करुन ताबडतोब त्यांचे निर्णय संबंधित पक्षास कळविले; तसेच संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी कळविलेल्या त्रुटींची पूर्तता करुन, तसेच मंजूर सुधारित विकास योजना/नियमावली यामध्ये सुसंगती साधण्याच्या दृष्टीने, तद्‌नंतर लवाद यांनी त्यांचेकडील अधिसूचना दि. ३०.१२.१९९५ अन्वये, **पूरक निवाडा** जाहीर केलेला आहे व उक्त प्रारुप योजनेची आखणी विहित नमुन्यात अंतिम करुन ताबडतोब त्यांचे निर्णय संबंधित पक्षास कळविले;

आणि ज्याअर्थी, उक्त अधिनियमाच्या कलम-७५ मधील तरतुदीनुसार शासनाने निर्णय क्र. टिपीव्ही -३०९३/१२७४/सीआर-१६९/९३/यूडी-२७, दि. ०६.०१.१९९५ अन्वये अपील न्यायाधिकरणाचे गठन केलेले आहे;

आणि ज्याअर्थी, लवाद तथा सहायक संचालक, नगर रचना, अलिबाग यांनी उक्त अधिनियमाच्या कलम ८२, पोट-कलम (२) मधील तरतुदीनुसार उक्त प्रारुप नगर रचना योजना अंतिम करुन, अंतिम योजनेवर अपील न्यायाधिकरणाने दि. २४.१२.२००३ रोजी दिलेल्या निर्णयानुसार आवश्यक ते बदल करुन, दिनांक ३०.१२.२००४ च्या पत्रान्वये **प्रारुप नगर रचना योजना पनवेल क्र.१ (प्रथम फेरबदल)(अंतिम)** ही योजना शासनास मंजुरीसाठी सादर केलेली आहे; (यापुढे उक्त *प्रारुप* अंतिम नगर रचना योजना असे संबोधित);

आणि ज्याअर्थी, उक्त अधिनियमाच्या कलम ८६, पोट-कलम (१) मधील तरतुदीनुसार उक्त अंतिम नगर रचना योजनेस, लवादाकडून तो उक्त अधिनियमाच्या कलम ८२ नुसार प्राप्त झाल्याच्या तारखेपासून

४ महिन्यात आत वा त्यासाठी शासनाने वाढवून दिलेल्या कालावधीच्या आत मंजुरी प्रदान करणे अथवा मंजुरी नाकारणे आवश्यक असते;

आणि ज्याअर्थी, आवश्यक ती चौकशी केल्यानंतर आणि संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेशी विचार विनीमय केल्यानंतर, उक्त अंतिम नगर रचना योजनेस सोबतच्या अनुसूचीप्रमाणे अधीन राहून मंजूरी देणे सार्वजनिक हिताचे दृष्टीने आवश्यक आहे असे शासनाचे मत आहे ;

**त्याअर्थी, आता उक्त अधिनियमाच्या कलम ८६, पोट-कलम (१) व (२) खालील अधिकारांचा व त्या संबंधातील इतर सर्व अधिकारांचा वापर करुन महाराष्ट्र शासन याद्वारे :-**

अ) उक्त अंतिम नगर रचना योजनेस मंजुरी प्रदान करण्याचा कालावधी दिनांक ३१ ऑगस्ट २००९ पर्यंत तो दिवस धरुन वाढवून देत आहे.
ब) लवादाने दिनाक ३०/१२/२००४ रोजी सादर केलेल्या योजने मधील फॉर्म -२ नुसार Total Increments मधील वाढ २०% पेक्षा जास्त असल्याने त्यास शासनाची कार्योत्तर मंजुरी प्रदान करण्यात येत आहे.

क) सोबतच्या परिशिष्ट मधील फेरबदलास अधीन राहून उक्त अंतिम योजना म्हणजे **नगर रचना योजना, पनवेल क्र.१ (प्रथम फेरबदल) (अंतिम)** मंजूर करीत आहे ;

ड ) निदेश देत आहेत की, मंजुरी दिल्याप्रमाणे उक्त **नगर रचना योजना, पनवेल क्र.१ (प्रथम फेरबदल) (अंतिम),** अंमलात आल्याच्या दिनांकापासून सहा महिन्यांच्या कालावधीसाठी, नागरिकांच्या अवलोकनार्थ कामकाजाच्या दिवशी कार्यालयीन वेळात पनवेल नगरपालिकेच्या मुख्य कार्यालयात उपलब्ध ठेवण्यात यावी;

इ) निदेश देत आहेत की, मंजुरी दिल्याप्रमाणे उक्त अंतिम नगर रचना योजनेची किंवा त्यामधील भागाची कारणापुरती प्रमाणित नकलेसाठी नागरिकांनी अर्ज केल्यास, वाजवी किमतीत पनवेल नगरपालिकेच्या कार्यालयात विक्रीसाठी उपलब्ध करावी आणि,

ई) मंजुरी दिल्याप्रमाणे **नगर रचना योजना, पनवेल क्र.१ (प्रथम फेरबदल) (अंतिम)** आणि त्यामुळे निर्माण झालेली सर्व दायित्वे अंमलात येण्यासाठी दिनांक १५ सप्टेंबर २००९ हा दिवस निश्चित करीत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,**

**(अशोक बा.पाटील)**
**कार्यासन अधिकारी.**

*-*-*-*-*-*

GOVERNMENT OF MAHARASHTRA
Urban Development Department
Mantralaya, Mumbai -400 032
Dated : 31st August 2009

Maharashtra Regional & Town Planning Act, 1966

No. TPS-1705/132/CR-34/08/UD-12, Whereas, by the Government Notification, Urban Development and Public Health Department No. TPS-1475 / 1439 / UD-6, dated 13-04-1976, issued under sub-section (2) of Section 68 of the Maharashtra Regional & Town Planning Act, 1966 (Mah.XXXVII of 1966) (hereinafter referred to as ' the said Act') the Government of Maharashtra has sanctioned the Draft Town Planning Scheme, Panvel (1st Variation) (Draft) (hereinafter referred to as ' the said Draft Scheme ') submitted by the Panvel Municipal Council under letter no. 29 dated 08-04-1975;

And whereas, by Government Notification, Urban Development and Public Health Department No. TPS-1475/1439/UD-6, dated 15-04-1976 the erstwhile Deputy Director of Town Planning, Mumbai Division, Mumbai was appointed as the Arbitrator for finalising the said Draft Scheme, further vide Notification No.TPS-1480/1779/UD-5, dated 07.04.1981 Arbitrator, Town Planning Scheme, Jalgaon (whose office was subsequently shifted to Shrirampur vide resolution dated 13.01.1984) was came to be appointed as the Arbitrator under Section 72(1) of the said Act and further to facilitate the easy functioning, the Director of Town Planning, Maharashtra State, Pune vide his Notification No.TPS-Panvel/No-I/90-96/TPV-3/847, dated 18.02.1997 has appointed the Assistant Director of Town Planning, Alibag as the Arbitrator for finalising the said Draft Scheme,

And whereas, the Arbitrator as required under Clause (xviii) of sub-section (3) of Section 72 of the said Act, drawn up in the prescribed form, the final scheme in accordance with the said Draft Scheme, vide his Notification dated 25.09.1987 and his decisions had been communicated forthwith to the parties concerned; further as communicated by the Director of Town Planning, Maharashtra State, Pune, in order to remove the ambiguities as regard to the sanctioned development plan/revised development plan, and to incorporate the development control regulations contained in the sanctioned development plan, so as to have consistency therein, the Arbitrator, as required under Clause (xviii) of sub-section (3) of Section 72 of the said Act, had further drawn up in the prescribed form, the final scheme in accordance with the said Draft Scheme (hereinafter referred to as ' the said final scheme ') and declared a supplementary award vide his Notification dated 30.12.1995, and his decisions had been communicated forthwith to the parties concerned;

And whereas, the Tribunal of Appeal was constituted as required under Section 75 of the said Act vide Government Resolution No.TPV-3093/1274/CR-169/93/UD-27, dated 06.01.1995;

And whereas, the Assistant Director of Town Planning, Alibag as the Arbitrator has, as required under sub-section (2) of Section 82 of the said Act, forwarded the said final scheme after making due variations in accordance with the decisions of the Tribunal of Appeal dated 24.12.2003 to the State Government for sanction vide letter No.2152 dated 30.12.2004 (hereinafter referred to as ' the said draft final scheme ');

And whereas, in accordance with the provisions of sub-section (1) of Section 86 of the said Act, the said final scheme is required to be sanctioned within a period of four months from the date of receipt of the final scheme from the Arbitrator under Section 82(2) of the said Act, or within such further period as the State Government may extend;

And whereas, the Government of Maharashtra after making necessary enquiries and after consulting the Director of Town Planning, Maharashtra State, Pune, proposes to sanction the said draft final scheme in the interest of public, subject to some modifications as mentioned in the Schedule enclosed hereto;

Now, therefore, in exercise of the powers conferred by sub-section (1) and (2) of Section 86 of the said Act and all other powers enabling it in that behalf, the Government of Maharashtra hereby: -

(a) extends the period for sanctioning the said draft final scheme by a further period up to and inclusive of 31 st August 2009.

(b) sanctions the said final scheme i.e. Town Planning Scheme, Panvel No.1 (1st Variation) (Final)subject to modification as specified in the schedule appended hereto,

(c) directs that the said Town Planning Scheme, Panvel No.1 (1st Variation) (Final) as sanctioned shall be kept open for inspection by the public for a period of six months after it comes into force, during office hours on all working days in the head office of the Panvel Municipal Council,

(d) directs that the copies of the said final scheme or extracts therefrom certified to be correct shall be available for sale to the public on application at a reasonable price at the office of the Panvel Municipal Council, and

(e) fixes 15th September to be the date on which all the liabilities created shall take effect and the said final scheme i.e. Town Planning Scheme, Panvel No.1 (1st Variation) (Final) as sanctioned shall come into force.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

(Ashok B. Patil)
Section Officer

*-*-*-*-*-*

## परिशिष्ट

**नगर रचना योजना, पनवेल क्रं.१ (प्रथम फेरबदल) (अंतिम)**
**शासन निर्णय क्रं.टिपीएस-१७०५/१३२/प्र.क्र.३४/०८/नवि-१२ दिंनाक - ३१ ऑगस्ट २००९ सोबतचे परिशिष्ट.**

**महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियमाच्या कलम ८६ मधील तरतुदीनुसार शासन निर्णयः-**

१) संरक्षित कुळांबाबत मा.उच्च न्यायालयाने याचिक क्रं.४८४५/२००६, दिंनाक ९/२/२००७ नुसार महाराष्ट्र ॲग्रीकल्चर टेनन्सी ॲक्ट नुसार लवाद/सक्षम प्राधिकरणाचा निर्णय अंतिम राहील.

२) नगर रचना योजनेच्या फॉर्म-१ मधील रकाना क्रं.५ मध्ये मुळ भुखंड क्रं. ४०१ समोर नमुद ३८२० चौ.मी व ८३१० चौ.मी या क्षेत्रासाठी सामाईक कंस दर्शविण्यात येत आहे.

३) अंतिम भुखंड क्रं.१९९,२००,५३३,५३४,५३८ या भुखंडाबाबतचा निर्णय मा.उच्च न्यायालयाचा अंतिम निर्णय होईपर्यंत स्थगित ठेवण्यात आली आहे.

४) सन १९९३ च्या मंजुर सुधारित विकास योजनेमध्ये नव्याने प्रस्तावित केलेली आरक्षणे जी प्रारुप नगर रचना योजनेत नाहीत ती तुटक काळया रंगाच्या किनारीने नगर रचना योजनेमध्ये दर्शविली,असून त्याची मालकी संबधित जमीन मालकांकडे ठेवण्यात आली आहे.

(अशोक बा.पाटील)
कार्यासन अधिकारी